विद्यमान शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी दुसरी पाळी सुरू करणे.

सन २०१४-१५ करिता अनुदानाचे वाटप.

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः : तंत्रनि-२०१४/प्र.क्र. ६९/का.८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीखः १२ फेब्रुवारी, २०१५.

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकःउच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्रमांक:टिईडी-२०१० /(३३४/२००९)/ तांशि-५, दि. १३/९/२०११.

२) शासन निर्णय क्रमांकः उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. :टिईडी-२०११/ (३४७/२०११)/तांशि-५, दि. १९/७/२०१२.

३) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक,तंत्रनि-२०१३/प्र.क्र.६९/का-८, दि.७ जुलै, २०१४

४) शासन निर्णय क्रमांकः उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. :मान्यता-२०१४/ प्र.क्र.७०/तांशि-५, दि. ८ जुलै, २०१४

५) शासन परिपत्रक क्रमांकः वित्त विभाग, क्रमांक : अंदाज - २०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि.०१.०७.२०१४.

६) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमाक - तंत्रनि-२०१४/ प्र.क्र.६९/ का-८, दि.२७ नोव्हेंबर, २०१४

७) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अंदाज/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३,दि.०२.जानेवारी २०१५.

८) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे क्रमांक ९/नियोजन/तंत्रशिक्षण /अल्पसुद.पा/२०१४ दि.०२.०२.२०१५ रोजीचे मागणीपत्र.

**प्रस्तावना**

शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, दि. १३.०९.२०११ अन्वये सन २०११-१२ पासून ठाणे, सोलापूर, जळगाव, नांदेड, यवतमाळ, मुंबई शहर व मुंबई उपनगर या ७, शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, दि.१९.७.२०१२ अन्वये सन २०१२-१३ पासून रत्नागिरी, कराड, ब्रम्हपुरी, जालना,

अंबड या ५ व दि.०८.०७.२०१४ अन्वये सन २०१४-१५ पासून पुणे,लातूर,हिंगोली या ३ अशा एकूण १५ ठिकाणच्या शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी दुसरी पाळी सुरू करण्यात आली आहे. वित्त विभागाचे दि.२ जानेवारी २०१५ च्या परिपत्रकाव्दारे योजनांतर्गतसाठी अर्थसंकल्पित निधी खर्च करण्याची मर्यादा ६०% एवढी विहीत करण्यात आली आहे.तसेच माहे जानेवारी २०१५ ते माहे मार्च २०१५ या तिमाहीकरिता ०१-वेतन,०६ दूरध्वनी,वीज व पाणी शुल्क,१४ भाडेपटटी व कर,२४ पेट्रोल,तेल व वंगण,३४ शिष्यवृत्या व विघावेतन,यासाठीच्या योजनेत्तर व योजनांतर्गत तरतूदीच्या ४०% निधी पूर्वीच्या पध्दतीने एकरित्रित्या वितरीत केली आहे.म्हणजेच यासाठी आता १००% तरतूद उपलब्ध असल्याचे उक्त परिपत्रकात स्पष्ट करण्यात आले आहे. त्यानुसार सदर निधी उपलब्ध करून देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

शासकीय तंत्रनिकेतनामध्ये अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांसाठी सुरू करण्यात आलेल्या दुस-या पाळीचा खर्च भागविण्यासाठी " मागणी क्रमांक झेड ई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यकम, राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (३०) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये दुसरी पाळी सुरू करणे, (२२३५ बी ०२२)" या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षाकरिता या विभागाच्या दिनांक ७ जुलै २०१४ व दिनांक २७ नोव्हेंबर २०१४ च्या शासन निर्णयान्वये रू.६,२२,१००००/-इतक्या निधीचे वाटप करण्यात आले आहे. आता रु.१,८४,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी चौऱ्याऐंशी लाख फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

(हजारात)

| अ.क्र. | बाब | अर्थसंकल्पित तरतूद (बी.डी.एस ) | शासन निर्णय दि.०७.०७.२०१४ व दि.२७.११.२०१४ अन्वये वितरीत अनुदान | या शासन निर्णयाव्दारे वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | ०१ वेतन | ४५००० | २६६०० | १८४०० |
| एकूण | | ४५००० | २६६०० | १८४०० |

२. सदर तरतूद संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते नियंत्रक अधिकारी आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. या योजनेअतंर्गत अल्पसंख्याक समाजातील विदयार्थ्यांना प्रवेश देण्यात येऊन त्याचा तपशील वेळोवेळी अल्पसंख्याक विकास विभागास सादर करावा. तसेच सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी विहित मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करावे.

४. सदर रक्कम वितरीत करण्यापूर्वी संचालक,तंत्रशिक्षण संचालनालय मुंबई यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/कार्यालयीन आदेश/वित्तीय नियमावली/ सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली/भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल/वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक २ जानेवारी २०१५ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१२१०४४२०७५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samir Ramesh Salunkhe

Digitally signed by Samir Ramesh Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samir Ramesh Salunkhe
Date: 2015.02.13 15:54:02 +05'30'

**( समीर साळुंखे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर

२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर

३. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,

४. संचालक , तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई ,

५. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतने, ठाणे, सोलापूर,जळगाव,नांदेड,यवतमाळ, मुंबई शहर,
६. मुंबई उपनगर, रत्नागिरी, जालना, अंबड, ब्रम्हपूरी, कराड, पुणे हिंगोली व लातूर
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. नियोजन विभाग का. १४७५,
१०.वित्त विभाग, व्यय-४/ अर्थ-३ व १४,
११.अवर सचिव (का.७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, कृपया सदर निधी B.D.S. वर उपलब्ध करुन द्यावा.
12. निवडनस्ती.